अरे, या पुस्तकाबरोबरच
हेही पुस्तक तुझ्याकडे
हवंय ना !



# हसा ! मुलांनो हसा !

खास मुलांसाठी
१५१ निवडक विनोद !



# हसा आणि हसवा

## ( १५१ विनोद )

संकलक
**सुनील अंबिके**



## १. आता बोला

महेश आंब्याच्या झाडावर चढून आंबे तोडीत होता. त्याला पाहताच रखवालदार ओरडला, ''अरे चोरा, तू आहेस होय. उद्याच तुझ्या वडिलांना जाऊन सांगतो.''

''उद्या कशाला? आत्ताच सांगा ना, ते वरच्या फांदीवर आहेत.'' महेश सहजपणे म्हणला.

■

## २. अरे देवा!

पप्पू: देव कुठं राहतो तुला ठावूकै?

गंपू: हो आमच्या बाथरूममध्ये.

पप्पू: काय?

गंपू: कालच माझी ममी बाथरूमच्या बाहेर उभी राहून म्हणत होती, 'अरे देवा! आणखी किती वेळ बाथरूम अडवून ठेवणार आहेस तू?'

■

## ३. माहिती

धावत आलेल्या जोसेफने आपल्या मम्मीला खबर दिली, ''मम्मी, आताच आपण बाहेर लावलेली शिडी माझ्या हातून पडली.''

''तुझ्या पप्पांना सांग जा.''

''त्यांना ठाऊक आहे. ते त्या शिडीवरच उभे होते.'' जोसेफ म्हणाला.

■

## ४. अभिप्राय

फुटबॉलची मॅच संपली. घरी परतत असताना जॉनने आपल्या मित्राला विचारले, ''कसा काय वाटला माझा खेळ?''

''झकास! तुझा खेळ पाहताना मला सारखी गॅरी सोबर्सची आठवण येत होती.''

''सोबर्सची? पण तो फुटबॉल थोडाच खेळतो?'' जॉनने आश्चर्य

व्यक्त केले.

''म्हणूनच तर म्हणतोय,'' मित्राने ऐकवले.

■

## ५. स्पष्टीकरण

टिक् टिक् करीत सिटी बसच्या कंडक्टरने वैभवला विचारले, ''कुठून बसलास तू?''

''स्नेहनगरहून.'' वैभव म्हणाला.

''पण मी तर तुला आनंदनगरला बसमध्ये चढताना पाहिलं.'' कंडक्टर संशयाने म्हणाला.

''हो. बसमध्ये चढलो आनंदनगरहूनच पण बसायला जागा स्नेहनगरला मिळाली. तोपर्यंत उभाच होतो मी.'' वैभवनं स्पष्टीकरण दिलं.

■

## ६. कामगिरी

किशोरचे मामा एक निष्णात डॉक्टर होते. शिवाय क्रिकेटमधील एक जलदगती गोलंदाज म्हणूनही ते प्रसिद्ध होते. एकदा एका क्लबबरोबर त्यांच्या संघाचा सामना होता.

हा सामना पाहण्यासाठी किशोरने आपल्या मित्राला निमंत्रण दिले. काही कारणामुळे मित्राला यायला उशीर झाला. तो मैदानावर पोचला तेव्हा मॅच सुरू होऊन बराच वेळ झाला होता. किशोरचा शोध घेऊन तो त्याच्याजवळ पोचला. उशीर झाल्याबद्दल क्षमायाचना करून त्याने विचारले, ''तुझ्या मामाने आज काय करामत केली?''

''चांगलीच करामत करून दाखविली आहे त्यांनी,'' किशोर उत्साहाने म्हणाला, ''आतापर्यंत त्यांना चार विकेटस् मिळाल्या आहेत आणि तीन पेशंट!''

■

## ७. बेकाम

सुटीत वाचण्यासाठी म्हणून दादूच्या मामांनी त्याला एक विनोदी कथांचं पुस्तक भेटीदाखल दिलं. आठ दिवसांनी मामांनी त्याला फोन करून विचारलं, ''काय दादू, आवडलं का पुस्तक?''

"मामा, खूपच जोरदार आहे पुस्तक! ते हातात घेऊन खाली ठेवेपर्यंत हसूनहसून माझी मुरकुंडी वळली! आता एकदा सवड मिळाली की ते वाचूनच काढणार आहे मी." दादू म्हणाला.

■

## ८. नामी उपाय

शिक्षक: दूध सुरक्षित ठेवण्याचा सगळ्यात चांगला उपाय कोणता?

गोपू: दूध गायी-म्हशींकडेच राहू द्यावं.

■

## ९. माहिती नाही

रेणुका वर्तमानपत्रातील जाहिराती न्याहाळीत होती. बाबांनी तिला विचारलं, "आज तारीख किती आहे ग?"

"माहीत नाही." रेणुका म्हणाली.

"अग, तुझ्या हातात वर्तमानपत्र आहे ना."

"काय उपयोग? हे वर्तमानपत्र तर कालचं आहे." रेणुका म्हणाली!

■

## १०. अनुभवाची शिदोरी

लेखक: हे हस्तलिखित गेल्या वर्षी मी आपणांस दाखवले होते.

संपादक: गेल्याच वर्षी मी ते साभार नाकारले होते. आता ते परत आणण्याचे प्रयोजन काय?

लेखक: हे पाहा, त्यानंतर एक वर्षाचा अनुभव आपल्या गाठी जमा झाला आहे.

■

## ११. आई का बाबा?

घरात आलेली पाहुणे मंडळी बऱ्याच वेळा घरातल्या लहान मुलांना एक प्रश्न विचारतात. अशाच एका पाहुणेकाकांनी बबडीलाही हा प्रश्न विचारला, "बबडी, तुला कोण आवडतं सांग बघू. आई का बाबा?"

"मला आई आणि बाबा दोघंही आवडतात." बबडी उत्तरली, "पण असा प्रश्न विचारणारे पाहुणे मात्र फारसे आवडत नाहीत."

■

## १२. पाटी

राजाभाऊ नव्या बंगल्यात राहायला आले. इथे फेरीवाल्यांचा, वर्गणी मागणाऱ्यांचा अन् भिकाऱ्यांचा खूपच त्रास होऊ लागला. तेव्हा त्यांनी आपल्या मित्राला उपाय विचारला. मित्राने एक पाटी लावण्याचा सल्ला दिला. पाटीवरचा मजकूर असा- 'आम्ही शाकाहारी आहोत, पण आमचा कुत्रा शाकाहारी नाही.'

■

## १३. आणखी कुठून ?

सोनू: आई, ही बघ छोटीशी सतार. मी स्वत: बनवलीय.

आई: अरे वा! फारच छान. पण सोनू, या सतारीसाठी तारा कुठून आणल्यास?

सोनू: अग, तुझ्या सतारीच्या काढून घेतल्या.

■

## १४. द्या !

शिक्षक रागावून म्हणाले, "गोट्या, तुझं अभ्यासाकडे मुळीच लक्ष नाही. वरून सारख्या तुझ्या खोड्या चालूच असतात. उद्या तुझ्या बाबांना बोलावून आण."

"सर, पन्नास रुपये द्या," गोट्या म्हणाला.

"पन्नास रुपये कसले रे?" शिक्षकांनी आश्चर्याने विचारले.

"सर, माझे पप्पा डॉक्टर आहेत. कोणाकडेही जायची त्यांची फी पन्नास रुपये आहे," गोट्या म्हणाला.

■

## १५. आता बोला

एक वृद्ध गृहस्थ एका शाळेत शिरले. शाळेच्या मुख्याध्यापकांची भेट घेऊन ते म्हणाले, "माझा नातू गोपाळ तुमच्या शाळेत आठव्या इयत्तेत शिकतोय. मला त्याची भेट हवी आहे."

सेवकाकरवी चौकशी करून मुख्याध्यापक म्हणाले, "तुम्हाला थोडासा उशीर झालाय. थोड्याच वेळापूर्वी तुम्हांला पाहण्यासाठी हॉस्पिटलमध्ये जायचे आहे, असे सांगून सुट्टी घेऊन गेलाय तो."

■

## १६. कारण

फलंदाज वाट्टेल तशी बॅट फिरवीत होता. केवळ नशिबानंच तो बाद होत नव्हता एवढंच. त्याचा खेळ पाहून शैलेंद्र आपल्या मित्राला म्हणाला, ''या गाढवाला कोणी सांगितलंय की त्याला बॅटींग येते म्हणून?''

''कुणीच नाही. पण त्याला बॅटींग येत नाही हे त्याला सांगणार कोण... अन् त्याचा उपयोग तरी काय?''

''का?''

''अरे, बॅट त्याच्या मालकीची आहे.''

■

## १७. प्रसिद्ध

एक नवोदित कादंबरीकार प्रकाशकाकडे गेला व म्हणाला, ''साधारण दोन महिन्यांपूर्वी मी तुम्हाला नव्याकोऱ्या कादंबरीचं हस्तलिखित दिलं होतं. तुम्ही माझी कादंबरी वाचलीत काय''?

''होय, पण त्याचं काय आहे, आमची प्रकाशन संस्था फक्त प्रसिद्ध नाव असलेल्यांची पुस्तके छापते.''

''फारच छान!'' कादंबरीकार म्हणाला, ''मग माझी कादंबरी प्रकाशित करण्यात काहीच अडचण येणार नाही, माझं नाव देशपांडे आहे.''

■

## १८. आठवते अजूनी

चिमणरावांच्या बंड्याने सारखा पिच्छा पुरवल्यावर ते एके संध्याकाळी त्याला घेऊन फिरायला गेले. बऱ्याच वेळेपर्यंत भटकंती झाल्यावर चिमणराव बंड्याला म्हणाले, ''चल आपण आणखी एक-एक भेळ खाऊ या.''

''आणखी एक? आपण तर एकही भेळ खाल्ली नाहीये अजून...'' बंड्या चकित होऊन म्हणाला.

''विसरलास तू,'' चिमणराव काहीसे चिडून म्हणाले, ''दोन वर्षांपूर्वी इथे आलो होतो तेव्हा भेळ खाल्ली होती आपण.''

■

## १९. दुसरी चूक!

संजूने आपला पॉकिट ट्रॅन्झिस्टर रेडिओ दुरुस्तीवाल्याकडे नेला. त्याच्या हातात ट्रॅन्झिस्टर देत तो म्हणाला, "काल चूकच झाली माझ्या हातनं. कॉमेंट्री लावताना हा खाली पडला आणि..."

"तू दुसरी चूक केलीस ती पडलेल्या ट्रॅन्झिस्टरला उचलण्याची." दुरुस्तीवाल्याने ऐकवले.

■

## २०. नाईलाज

पिंजऱ्यात उभ्या असलेल्या आरोपीला न्यायाधिशांनी विचारलं,

"रेडीमेड कपडे का चोरलेस तू?"

"न्यायालयात येण्याजोगे कपडेच नव्हते साहेब माझ्याजवळ." आरोपी म्हणाला.

■

## २१. त्यात काय?

शरद मोठ्यानं वाचत होता, 'न्यूटन बागेत बसला होता. कसल्याशा विचारांत तो गढला होता. एवढ्यात एक सफरचंद झाडावरून पडलं. त्याला खूप आश्चर्य वाटलं.'

"यात आश्चर्य ते काय? सफरचंद जर जमिनीवरून वर जाऊन झाडाला चिटकलं असतं तर गोष्ट वेगळी." त्याचं वाचन ऐकणाऱ्या वर्षानं म्हटलं.

■

## २२. पर्याय

एका कामगार पुढाऱ्याने आपल्या चिरंजीवांसाठी एक छानशी रेल्वे आणून दिली. दररोज आपल्या साऱ्या मित्रांना गोळा करून तो मनसोक्त खेळायचा. एके दिवशी कसल्याशा कारणामुळे रागावून त्याची आई त्याला म्हणाली, "तुला शिक्षा म्हणून उद्या रेल्वे खेळायला मिळणार नाही."

"नाही तर नाही." चिरंजीव म्हणाले, "आम्ही उद्या रेल्वेचा संप करू."

■

## २३. घाई

मेघा तासभरापासून दारातच उभी राहून कुणाशी तरी गप्पा मारीत होती. एकदाच्या त्यांच्या गप्पा संपल्या. ती आत वळली तेव्हा बाबांनी सहजच विचारलं, ''कोण होतं गं? कोणाशी बोलत होतीस?''

''आपल्या शेजारची माधवी.'' मेघा म्हणाली.

''मग तिला आत तरी बोलवायचं.''

''तिला आत यायला वेळच नव्हता मुळी. ती फारच घाईत होती.'' मेघा म्हणाली.

■

## २४. कारण

''जाडी माणसं खूप आनंदी असतात. अशी माणसं कुणाशी भांडत नाहीत.''

''ते त्यांना शक्य नसतं.''

''म्हणजे?''

''एक तर त्यांना भांडताच येत नाही, अन् भांडण झालं तर वेगानं पसार होता येत नाही.''

■

## २५. वेदनेची भाषा

एक पुजारी आपल्या बंगल्याभोवतालचे कुंपण ठोकून-ठाकून दुरुस्त करीत होता. शेजारच्या बंगल्यातील मुलगा त्याकडे लक्ष देऊन पाहत होता.

''कुंपणाची देखभाल कशी करायची, याची तू माहिती करून घेतो आहेस का?'' पुजाऱ्याने त्याला मोठ्या कुतूहलाने विचारले.

''नाही, महाराज,'' सुनील मोठ्या विनयपूर्वक भाषेत त्यांना म्हणाला, ''मी पाहतो आहे, की समजा हातोड्याचा प्रहार चुकून आंगठ्यावर पडला तर आपल्या मुखावाटे कोणते शब्द बाहेर पडतील.''

■

## २६. चिंता नंतर करा!

चार चाकी वाहन चालवण्याचा परवाना घेण्यासाठी जाणाऱ्या आपल्या मुलीबरोबर अण्णाही गेले. जुजबी प्रश्नोत्तरं झाल्यावर परवाना अधिकारी

मुलीबरोबर तिची चाचणी घेण्यासाठी बाहेर गेले. बराच वेळ झाला तसे अण्णा चिंताक्रांत होऊन इकडून तिकडे येरझाऱ्या घालत राहिले. अण्णांची ती काळजीयुक्त हालचाल पाहणारा एक अधिकारी जवळ आला आणि त्यांना म्हणाला, ''बसा साहेब, तुमची मुलगी चाचणी परीक्षेत पास झाली आणि तिला परवाना मिळाला, की मग काळजी करा. आता सध्या तरी शांत बसा!''

■

## २७. प्रमाण

स्नेहलने पहिल्यांदाच मोठ्या उत्साहाने स्वयंपाक केला. सगळ्यांना जेवायला वाढण्यात आलं. स्नेहलने उत्सुकतेने आपल्या छोट्या भावाला विचारलं, ''बंकू, कशी झाली रे भाजी?''

''तू जेवढी बनवलीस, त्याच्या चारपट बनवली असतीस, तर छान झाली असतं.'' बंकू म्हणाला.

''अय्या! एवढी आवडली तुला भाजी?''

''तसं नाही ग! तू जेवढं मीठ या भाजीत टाकलंस ना ते प्रमाण लक्षात घेऊन म्हणतोय मी.'' बंकू म्हणाला!

■

## २८. चांगुलपणा

वत्सलाबाई आपल्या पतिराजांना सांगत होत्या, ''किनई.... आपले शेजारी फारच चांगले आहेत.''

''ते कसं काय?'' पतिराजांनी उत्सुकतेने विचारलं.

''मी त्यांना शेरभर पीठ मागितलं तर त्यांनी ताबडतोब दिलं मला.'' वत्सलाबाई म्हणाल्या.

■

## २९. किती सोप्पं!

शाळेतील प्रश्नमंजूषेत एका खट्याळ मुलाने प्रश्न लिहून टाकला- 'मी बाजारातून एका नव्या कंपनीचा साबण विकत घेतला होता. या साबणानं माझा शर्ट धुतला तर तो आकसून लहान झालाय. आता मी काय करावं?'

'त्याच साबणानं अंघोळ करावी,' त्याला उत्तर देण्यात आलं.

■

### ३०. व्याकरण

"झाड या शब्दाचं अनेकवचन काय?"
"जंगल."

■

### ३१. सॉऽऽऽरी

ऑफिसातून आलेल्या बाबांकडे रवीने तक्रार केली.
"पप्पा, ताईनं मला दुपारी मारलं."
"पण मी लगेच सॉरी म्हणाले पप्पा." ताई म्हणाली.
"फारच जोरात गुद्दा घातला पप्पा हिनं."
"सॉरीसुद्धा मोठ्यानं म्हणाले होते मी." ताई म्हणाली.

■

### ३२. शासन

मधुमक्षिका पालनकेंद्र पाहत असताना एका मधमाशीने राजाभाऊंचा कडकडून चावा घेतला.

राजाभाऊंनी लगेच केंद्राच्या व्यवस्थापकाकडे तक्रार केली, 'तुमच्या केंद्रातील माशी मला चावली आहे, या बाबतीत तुम्ही कारवाई केली पाहिजे असं मला वाटतं.'

"अवश्य साहेब" व्यवस्थापक म्हणाले, "तुम्ही मला फक्त ती माशी दाखवा. तिला अगदी कडक शासन केले जाईल."

■

### ३३. हवं तर पाहून घे!

पीटरला कुत्रा हवा होता. त्याचे बाबा त्याला कुत्र्या-मांजरांच्या दुकानात घेऊन गेले.

दुकानदाराने बरीचशी कुत्री दाखविली पण पीटरला एकही कुत्रा पसंद पडेना. प्रत्येक कुत्र्यात त्याला काही ना काही दोष दिसायचा. बऱ्याचशा कुत्र्यांनंतर दुकानदाराने एक छानसा पांढरा कुत्रा त्याच्या हाती दिला. त्याला आपदमस्तक न्याहाळून पीटर म्हणाला, "कुत्रा

तसा चांगला आहे. पण त्याचे पाय आखूड वाटतात बुवा!''

''आखूड असले तरी चार पाय जमिनीवर टेकतात, हवं तर पाहून घे बाळ.'' दुकानदार म्हणाला.

■

## ३४. तुम्हाला कसं माहीत?

पारुअण्णांनी हॉटेलातल्या पोऱ्याला चहाची ऑर्डर दिली. चहा आल्यावर एक घोट घेऊन ते काहीसे रागावून म्हणाले, ''चहा आहे हा? हे तर गटाराच्या पाण्यासारखं घाणेरडं लागतंय.''

''पण साहेब, तुम्हाला गटाराच्या पाण्याची चव काय माहीत?'' पोऱ्याने विचारलं.

■

## ३५. चिंता नको

अपर्णा एके दिवशी आपल्या गुरूंना म्हणाली, ''माझ्या हातून फारच मोठं पाप घडतंय गुरुजी. सकाळी उठून जेव्हा मी आरसा पाहते, तेव्हा आपण जगातील सर्वश्रेष्ठ नृत्यांगना आहोत, असा अहंकारी विचार माझ्या मनात येतो.''

''चिंता करू नकोस. गैरसमज म्हणजे काही पाप नव्हे.'' गुरुजींनी तिला समजावले.

■

## ३६. अति रहस्यमय!

नुकतंच वाचून हातावेगळं केलेल्या पुस्तकाबद्दल बोलताना मनोहर म्हणाला, ''जबरदस्त रहस्यमय आहे बुवा ही कादंबरी.''

''असं आहे तरी काय यात?'' एकाने विचारले.

''अरे, या पुस्तकातील नायकाचा खून दुसऱ्याच पुस्तकातील खलनायक करतो.'' मनोहर म्हणाला.

■

## ३७. तेच तर करतो.

बाबा रागावून केशवला म्हणाले, ''गाढवा, तुझ्याबद्दल तक्रार आलीय. अभ्यासाकडं थोडं लक्ष दे.''

''मी नेहमीच तर 'थोडं' लक्ष देत असतो अभ्यासाकडे.'' केशव म्हणाला.

■

## ३८. दुसरं काय?

एकदा एका कुत्र्याने गाढवाला प्रश्न केला, ''माणूस नेहमी 'मूर्ख' म्हणून तुमचीच उपमा का देत असावा?''

''निव्वळ मत्सरामुळे! मित्रा, दुसरे कोणतेच कारण नाही.'' गाढव शांतपणे म्हणाले.

■

## ३९. नको रे बाबा!

दासोपंताचा मुलगा धावत धावत उत्साहाने घरात घुसला. ''बाबा! बाबा!'' तो म्हणाला, ''मला शाळेच्या नाटकात एक भूमिका मिळाली.''

''व्वा, छान!'' दासोपंत मोठ्या खुशीत येऊन त्याला म्हणाले. ''तुझी नाटकात कोणती भूमिका आहे?''

''मी वडिलांची भूमिका वठवणार आहे.''

दासोपंतांनी काही क्षण विचार केला. त्यांनी त्याला सूचना दिली, ''त्यांना सांग, की तुला बोलण्याची भूमिका हवी.''

■

## ४०. शिडी

''अरे, माझ्या पणजोबांचं घर एवढं मोठं होतं म्हणून सांगू की सगळं आकाशच जणू त्यात मावलं असतं.'' गप्पापंत सांगत होते.

''अरे बापरे! केवढं मोठं असेल ते! मला आठवतंय, माझ्याही पणजोबांकडे अशीच एक उंचच्या उंच शिडी होती. उभी केली असती तर आकाशालाच टेकली असती.'' थापासिंग म्हणाले.

''बापरे!, अरे, पण ठेवायचे तरी कोठे ती शिडी?''

''अरे, तुझ्याच पणजोबांच्या घरात!''

■

### ४१. कारण

"नेहमी भटकणारा बंड्या आज वीस दिवस झाले, पण एकदाही घराबाहेर पडला नाही."

"वा! बरीच सुधारणा झालीय म्हणायची."

"तसं काही नाही."

"मग?"

"त्याची तंगडी मोडली आहेना, म्हणून घरीच पडून आहे तो."

■

### ४२. आज्ञाधारक

तोंडावर फडकं बांधून फिरणाऱ्या संदीपला पाहून राजूने आश्चर्याने विचारले, "हे काय? असं फडकं बांधून का फिरतोस?"

"पप्पांच्या आज्ञेचं पालन करतोय," संदीप गंभीरपणे म्हणाला.
"म्हणजे?" राजू आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

"माझे पप्पा म्हणाले होते.... चांगले गुण मिळाले नाही तर तोंड दाखवू नकोस," संदीप उत्तरला.

■

### ४३. शस्त्र आणि अस्त्र

शस्त्र आणि अस्त्र यांतील फरक सविस्तरपणे समजावून दिल्यानंतर शिक्षकांनी बंडूला विचारले,

"बंड्या, काठीला शस्त्र म्हणावे की अस्त्र?"

"दोन्ही" बंड्या म्हणाला.

"ते कसं काय रे?"

"काठी हातात धरून रट्टे दिले तर शस्त्र अन् काठी फेकून मारली तर अस्त्र," बंड्याने खुलासा केला.

■

### ४४. शव्वाशेर!

चिक्कूशेठ मगनलाल यांच्या घरी उंदरांनी उच्छाद मांडला होता. शेजाऱ्यांकडून त्यांनी पिंजरा मागून आणला. पिंजऱ्यात खाद्यपदार्थ ठेवायला मात्र त्यांच्या जिवावर आलं. खूप विचार करून त्यांनी रद्दी वर्तमानपत्रातील

एक चित्र शोधून काढलं. जिलेबीचं चित्र होतं ते. चित्र व्यवस्थित कापून त्यांनी पिंजऱ्यात लटकावून दिलं. आपल्या युक्तीवर त्यांना खूपच अभिमान वाटत होता. आनंदाने ते झोपले.

सकाळी उठल्या-उठल्या ते पिंजऱ्याजवळ गेले. जिलेबीचं चित्र गायब झालं होतं अन् त्या जागी उंदराचं चित्र होतं!

■

## ४५. अरे चोरा!

तुरुंगात नव्याने आलेल्या कैद्याला एका जुन्या कैद्यानं विचारलं, ''कशामुळे झाली तुला शिक्षा?''

''दोरी चोरल्यानं झाली मला शिक्षा.''

''काय? नुस्ती दोरी चोरल्यानं शिक्षा झाली?'' जुन्या कैद्यानं आश्चर्य व्यक्त केलं.

''होय बाबा... दोरीचं एक टोक माझ्या हातात अन् दुसऱ्या टोकाला म्हैस होती बांधलेली.''

■

## ४६. आराम द्या-द्या!

बडबड्या शांताबाईंना आपली प्रकृती बिघडली आहे, असे वाटल्याने त्या फॅमिली डॉक्टरकडे गेल्या. तपासणी चालू असताना त्यांची बडबड सारखी चालूच होती.

तपासणी झाल्यावर डॉक्टर म्हणाले, ''घाबरण्यासारखे काहीही नाही, तुम्ही भरपूर आराम करा.''

शांताबाईंचे समाधान झाले नाही. त्या म्हणाल्या, ''असं कसं होईल डॉक्टर? मला काहीतरी नक्कीच झालंय... तुम्ही पुन्हा एकदा तपासून पाहा...निदान माझी जीभ तरी पाहा...''

''तिलासुद्धा आता पूर्ण आराम द्या म्हणजे तुम्हालाही नक्कीच बरं वाटेल.'' डॉक्टर म्हणाले.

■

## ४७. काय हा गोंगाट!

शहरातील कोलाहलाला कंटाळून तीन मित्र दूर हिमालयात गेले. तिथे चारी बाजूंना नीरव शांतता होती. कसलाच आवाज नाही, कसलाच

गोंगाट नाही. सारं कसं शांत शांत! प्रसन्न चित्ताने ते तिथे राहू लागले. कुणी कुणाशी एक शब्द देखील बोलत नव्हता. अशीच पाच वर्षे गेली आणि एक मित्र उद्गारला, ''अहाहा! किती शांतता आहे इथे!''

बस्स! त्यानंतर त्याने पुन्हा तोंड उघडले नाही. आणखी पाच वर्षांचा अवधी लोटला.

''खरंच, किती शांत वातावरण आहे इथं.'' दुसरा म्हणाला.

''हे पाहा, तुम्ही दोघे दर पाच वर्षांनी असं बोलणार असाल तर ही जागा सोडून मी दुसरीकडे चालता होईन,'' तिसरा मित्र त्राग्यानं म्हणाला.

■

## ४८. गती

एके ठिकाणी बांधकाम चालू होते. कामगारांत धोंडूही होता. तो फारच संथगतीने काम करीत होता. वारंवार सूचना देऊनही त्याची गती वाढतच नव्हती.

बऱ्याच वेळानंतर ठेकेदार एकदम रागावून म्हणाला, ''मी मघापास्नं तुझं काम पाहतोय. किती हळूहळू काम करतोस तू. जलद गतीनं अशी एक तरी गोष्ट जमते का तुला?''

''हो.'' धोंडू म्हणाला, ''इतरांपेक्षा मला फारच लवकर कंटाळा येतो.''

■

## ४९. चमत्कार

संपतरावांचे डोळे तपासून झाल्यावर डॉक्टर त्यांना चष्म्याचा नंबर देत म्हणाले, ''हा चष्मा तयार करून घ्या. चष्म्यानं सगळं काही स्पष्ट दिसायला लागेल. अगदी वर्तमानपत्र देखील वाचता येईल तुम्हाला.''

''चष्मा लावल्यावर वाचायाबी येईल?'' संपतरावांनी विचारले.

''हो नक्कीच!''

''मग तर कमालच म्हणायची. खरं म्हंजे मी पडलो अंगठे बहाद्दर लिवाय-वाचाय काय शिकलोच नाय बगा.'' संपतराव आनंदाने म्हणाले.

■

## ५०. परीक्षा

छोटू अन् गोटू हे जुळे भाऊ एकाच वर्गात होते. एके दिवशी शाळेतून परतल्यावर छोटू आईला म्हणाला, '' आज आमची परीक्षा झाली.''

'' असं? काय विचारलं परीक्षेत? '' आईने विचारलं.

'' तुझ्या बाबांचं नाव काय? ''

'' मग काय म्हणालास तू? ''

'' माधवराव नाडकर्णी. ''

'' शाबास! अन् गोटू तुला काय विचारलं? ''

'' तोच प्रश्न. ''

'' तू काय उत्तर दिलंस? ''

'' केशवराव नाडकर्णी. ''

'' अरे, हे तर तुझ्या आजोबांचं नाव आहे. ''

'' मला माहीत आहे ग. पण सारखंच नाव सांगितल्यावर मी कॉपी करतोय असं सरांना वाटलं असतं ना. '' गोटू म्हणाला.

■

## ५१. काळ बदललाय!

नेने सरांनी केंद्रिय मंत्रिमंडळातील सर्व मंत्र्यांची नावे लिहायला सांगितली.

फक्त दोनच मुलांनी सर्व नावे बरोबर लिहिली. तेव्हा ते रागावून म्हणाले, '' आमच्या वेळी साऱ्या वर्गाला सगळं मंत्रिमंडळ तोंडपाठ असायचं. ''

'' पण सर, त्या वेळी मंत्रिमंडळे लहान असायची ना! '' मागून एक आवाज आला!!

■

## ५२. घाबरू नका

प्राणीसंग्रहालयातील प्राणी पाहण्यात गुंग झालेला सुदाम वेगवेगळे प्राणी पाहता-पाहता हत्तीच्या अगदी जवळ जाऊन ठेपला. त्याला हत्तीच्या जवळ गेलेला पाहून पहारेकरी ओरडला, '' अरे, हत्तीपासून दूर राहा बाबा. ''

'' अहो, मी फक्त पाहतोय त्याला.... मुळीच मारणार नाही मी त्याला. '' सुदाम म्हणाला.

■

## ५३. साम्य

''चंद्राचा एक दिवस पृथ्वीच्या चौदा दिवसांच्या बरोबर असतो.''
''अगदी आमच्या शिंप्यासारखाच प्रकार म्हणायचा.''

■

## ५४. नट

तीन नट अलीकडे बेकार होते. काय करावे म्हणजे प्रेक्षकांची गर्दी उसळेल आणि पोटापाण्याचा आपला प्रश्न मिटेल, याची चर्चा करत होते.

''आपण एक पाश्चिमात्य कलाप्रकार पेश करावा. त्यासाठी माझ्याकडे योजना आहे, ''एक नट सांगू लागला, ''पडदा वर जातो, मी रंगभूमीवर प्रवेशतो. विनोदी आविर्भाव करत झकास विनोद सांगून प्रेक्षकांचे लक्ष आपल्याकडे खेचतो, टाळ्या. पडदा खाली येतो. आता पडदा पुन्हा वर जातो. तसा मी पुढे येऊन दोन फर्मास गाणी गाऊन प्रेक्षकांची वाहवा मिळवतो. एवढ्यात पडदा परत हळूहळू खाली येतो नि काही क्षणांत परत वर जातो...''

''दोस्ता, एक क्षण थांब,'' त्याचे दोन साथीदार त्याला थांबवत म्हणाले, ''आम्ही या वेळी काय करायचं?''

''पडदा काही आपोआप वर-खाली होणार नाही.'' पहिला नट म्हणाला.

■

## ५५. आवड

''तुमच्या वडिलांची सगळ्यात जास्त आवडती जी गोष्ट असेल त्याचं चित्र काढा आज.'' वर्गात आल्याआल्याच चित्रकलेच्या शिक्षकांनी सगळ्या मुलांना सांगितले.

भराभरा मुलं चित्र काढत होती. कोणी पेनचं चित्र काढलं, कोणी वर्तमानपत्राचं, कोणी चहाचा कप काढला, तर कोणी कोंबडी. एक मुलगी नुसतीच कागदाकडे बघत बसली.

''सर, मी माझंच चित्र काढलं तर चालेल? माझ्या वडिलांना मीच जास्त आवडते.'' शिक्षक तिच्याजवळ येताच तिनं विचारलं.

■

### ९६. हम सब एक है!

वेड्यांच्या इस्पितळाजवळ असलेल्या तलावाकाठी राजाभाऊ मासेमारीसाठी ठाण मारून बसले. सूर्यास्तापर्यंत ते तिथेच होते. संध्याकाळी घरी परतत असताना, दिवसभर त्यांचे निरीक्षण करत असलेल्या एका वेड्याने खिडकीतून त्यांना विचारले, ''दिवसभर तलावाच्या काठी बसून तुम्ही काय करत होता?''

''मासे पकडत होतो.''

''किती मिळाले?''

''एकही नाही.''

''मग तुम्ही आमच्यात का येऊन बसत नाही?'' त्याने सहजपणे विचारले!

■

### ९७. समजलं?

रात्री अडीच वाजण्याच्या सुमारास फोन खणाणला. राजाभाऊंच्या नव्या शेजाऱ्याने फोन केला होता... 'हॅलो, मी तुमचा शेजारी देशपांडे बोलतोय. तुमच्या कुत्र्याच्या भुंकण्याने आमच्या झोपेचं खोबरं झालंय. त्याला गप्प बसवा.' अन् फोन डिस्कनेट करण्यात आला. राजाभाऊंना बोलण्याची संधीच मिळाली नाही.

दुसऱ्या दिवशी रात्री ठीक अडीच वाजता राजाभाऊंनी देशपांड्यांना फोन केला, 'हॅलोऽऽ देशपांडे का? मी राजाभाऊ बोलतोय. तुम्हाला म्हणून सांगतोय की माझ्याकडे कुत्र नाहीए.' अन् लगेच त्यांनी फोन ठेवून दिला!

■

### ९८. दान

एका सायकलस्वाराने एका पादचाऱ्याला धडक दिली. दोघेही खाली पडले. पादचारी शांतपणे उठून उभा राहिला अन् आपले कपडे झटकले. तोपर्यंत सायकलस्वारही उठून उभा राहिला. पादचाऱ्याने खिशात हात घालून एक रुपया काढला अन् सायकलस्वाराच्या हातावर ठेवला. सायकलस्वार आश्चर्याने म्हणाला, ''मी तुम्हाला धडक दिली अन्

तुम्ही मला रुपया देता?''

''अंधांना दान देणं माझं कर्तव्य समजतो मी,'' पादचारी उत्तरला.

■

## ५९. शहाणेच ते!

डॉक्टर शहाणे कसलंसं पुस्तक वाचत होते, तेव्हा त्यांचे छोटे चिरंजीव धावत येऊन म्हणाले, ''पप्पा, लवकर चला.''

''काय झालं रे?''

''गल्लीतील मुलं आपल्या झाडाची कच्ची बोरं तोडून खात आहेत.''

''खाऊ दे, खुशाल खाऊ दे. नाही तरी त्यांना उद्या माझ्याकडेच यावं लागणार आहे!'' डॉक्टरसाहेब पुन्हा पुस्तकात डोकं खुपसत म्हणाले.

■

## ६०. धन्यवाद द्या पण...!

गणिताच्या गुणे सरांना करंज्या खूप आवडतात, असे त्यांनी वर्गात म्हटल्याचे बाळूने आईला सांगितले. आईने दिवाळीचे निमित्त साधून त्यांच्याकडे करंज्या पाठवल्या.

एकदा रस्त्यात भेट झाल्यावर गुणे सर बाळूला म्हणाले, ''फारच स्वादिष्ट होत्या रे करंज्या. तुझ्या आईने पाठविलेल्या त्या पंधरा करंज्यांबद्दल त्यांना धन्यावाद द्यायला हवेत.''

''द्या सर, धन्यवाद जरूर द्या, पण दहा करंज्यांसाठीच द्या,'' बाळू विनवणीच्या स्वरात म्हणाला!

■

## ६१. माहीत आहे!

सुटीत आलेले पाहुणे सुटी संपायच्या बेताला परतण्याची तयारी करीत होते. गाड्यांचं वेळापत्रक पाहून यायचं काम दादूवर सोपविण्यात आलं होतं.

पाहुण्यांनी दादूला विचारलं, ''मी उद्या जाणार आहे. गाडीची वेळ नीट माहीत आहे नं तुला?''

''हो,'' दादू म्हणाला. ''गाडी आतापासून बरोबर १४ तास २१ मिनिटे आणि ३२ सेकंदांनी स्टेशनात येणार आहे.''

■

## ६२. फरक

शिक्षक : घोडा व हत्ती यांत कोणता फरक आहे. ?

छोटू : घोड्याला एकच शेपूट असतं. हत्तीला एक पुढे व एक मागे अशा दोन शेपट्या असतात.

■

## ६३. वास्तववादी

' मी मंत्री झालो तर.... ' या विषयावर निबंध लिहायला शिक्षकमहोदयांनी सांगितले. सगळी मुले लिहिण्यात गुंग झाली. सचिन मात्र निवांतपणे बसून होता. शिक्षकांनी त्याला विचारले, '' काय रे? नुसता बसून काय राहिलास ? ''

'' मी माझ्या पी. ए. ची वाट पाहतोय सर '' सचिन शांतपणे म्हणाला.

■

## ६४. कायदा पालन

हवालदार राजाराम एका चोराचा पाठलाग करीत होते. बऱ्याच वेळानंतर ते पोलिस-स्टेशनला परतले. ते रिकाम्या हाताने आलेले पाहून इन्स्पेक्टरने विचारलं, '' काय झालं ? चोर कुठाय ? ''

'' साहेब, मी त्याला जवळ-जवळ पकडलाच होता, पण तो एका सरकारी कार्यालयात शिरल्याने माझा नाईलाज झाला. ''

'' आं ? त्याचा काय संबंध ? ''

'' साहेब, कार्यालयाच्या दारावर एक पाटी होती ' परवानगी शिवाय आत येऊ नये.' पण तिथं कुणीच नसल्याने मला परवानगी घेता आली नाही... '' हवालदारसाहेब म्हणाले !!

■

## ६५. नाईलाज !

बराच वेळ अभ्यास केल्यानंतर बंड्चे दोन मित्र आपापल्या घरी गेले. काही वेळानं आईनं त्याच्या खोलीत डोकावून पाहिलं. तिथल्या टेबलावर असलेली सरबताची रिकामी बाटली पाहून ती ओरडली, '' सगळं सरबत संपवून टाकलं तुम्ही ? ''

'' पण आई... ''

''चूप! एक नवी कोरी अख्खी बाटली फक्त तिघांत संपवून टाकली, कमालच आहे.''

''आमचा नाईलाज झाला गं.''

''नाईलाज?'' आईनं आश्चर्य व्यक्त केलं.

''हो. या बाटलीचं झाकणच हरवलंय. मग काय करणार आम्ही?'' बंडू म्हणाला.

■

## ६६. चित्रसंगत

''बाबा,'' मुलगा सांगू लागला, ''आमच्या सरांना घोडा कसा दिसतो याची माहिती असेल असे मुळीच वाटत नाही.''

''तुझं मत असं कशामुळं झालं?'' बाबा म्हणाले.

''त्याचं असं झालं... मी घोड्याचं चित्र काढलं, ते रंगवलं. त्या वेळी त्यांनी मला विचारलं, भूतलावर असा कोणता प्राणी असू शकेल?''

■

## ६७. नंतर येऊ?

''हं, तुम्ही आजपासून कामाला सुरुवात करायला हरकत नाही. पहिले तीन महिने तुम्हांला दरमहा १५०० रुपये मिळतील. त्यानंतर दरमहा २५०० रुपये!''

''सर...!''

''काय? काही विचारायचं का आणखी?''

''अंऽऽऽ, हो सर. मी तीन महिन्यांनंतरच येऊ का तुमच्याकडे?''

■

## ६८. माकड आणि वाघ

एका प्राणीसंग्रहालयातले एक प्रचंड माकड मेले. त्या माकडाचे कातडे पांघरून एका माणसाला त्याच्या पिंजऱ्यात बसवण्यात आले. मोबदला म्हणून त्याला दररोज चाळीस रुपये मिळायचे.

एकदा ते नकली माकड उड्या मारत असताना पिंजऱ्याच्या दारातून फेकले गेले अन् सरळ वाघोबांच्या पिंजऱ्यात पडले. वाघोबा

पाहताच आपण माकड झालो आहोत, हे विसरून ते नकली माकड मोठ्याने ओरडू लागले, ''धावा... धावा... वाचवा... वाचवा...''

तोच वाघाने त्याच्याजवळ येऊन त्याला दटावले, ''मूर्खा, बोंबलू नकोस. नाहीतर तुझी अन् माझी दोघांचीही नोकरी जाईल.''

■

## ६९. वस्तुस्थिती

''साहेब, भिकाऱ्याला एक रुपया द्या. फार उपकार होतील तुमचे,'' भिकाऱ्याने राजाभाऊंना विनंती केली.

''दिला असता रे, पण माझ्याजवळ सुटे पैसेच नाहीत. पुन्हा कधी इकडे आलो म्हणजे नक्कीच देईन,'' राजाभाऊ म्हणाले.

''यामुळेच तर माझी अवस्था अशी झाली,'' भिकारी म्हणाला.

''म्हणजे रे काय? '' मी नाही समजलो,'' राजाभाऊंनी बुचकळ्यात पडून विचारले.

''अहो साहेब, अशी उधारी ठेवून-ठेवूनच तर मी भिकारी झालो,'' भिकारी म्हणाला.

■

## ७०. गुपित

एक पोलीस आपल्या सोबत एक कुत्रा घेऊन चालला होता. चिकित्सक वृत्तीच्या बाबूरावांनी हे दृश्य पाहिले, तेव्हा त्यांची उत्सुकता जागी झाली. त्यांनी पोलिसाला विचारले, ''काय हो हवालदारसाहेब, कोणता कुत्रा आहे हा? ''

''पोलीस-कुत्रा,'' पोलीस उत्तरला.

''पोलीस-कुत्रा? पण दिसण्यात तर तसं वाटत नाही,'' बाबूरावांनी शंकेनं विचारले.

''बरोबर आहे. हा गुप्त पोलीस खात्यात आहे,'' पोलीस शांतपणे म्हणाला!

■

## ७१. आणखी काय?

मराठीचे बर्वेसर नववीच्या वर्गात नारायण सुर्वे यांची 'चार शब्द'

ही कविता शिकवत होते. कवितेचा अर्थ सांगताना ते अगदी रंगून गेले. शिकवता शिकवता ते एका ओळीपाशी थांबले.... ओळ होती.. 'रोटी प्यारी खरी आणखी काही हवे आहे.' ओळ वाचल्यावर ते म्हणाले, ''माणसं नुसत्या भाकरीवर जगत नाहीत... याशिवायही आणखी काही लागतं जगण्यासाठी नाही का?''

मुलांनी माना डोलावल्या.

बर्वेसरांनी विचारले, ''भाकरीशिवाय आणखी काय लागतं बरं माणसाला?''

सारा वर्ग गप्प बसला. मुलांनी बोलावं म्हणून बर्वेसरांनी त्यांना प्रोत्साहन दिलं, तेव्हा दादू एकदम उठून उभा राहिला अन् म्हणाला, ''सर, माणसं नुसती भाकरी खाऊ शकत नाहीत. भाकरीबरोबर भाजीही लागते.''

■

## ७२. क्या 'चीज' है!

शिक्षक: संगीतातला माहितगार इथं कोण आहे?

एक विद्यार्थी: मी आहे सर!

शिक्षक: मग जा तर, तो हार्मोनियम आपल्या त्या हॉलमध्ये नेऊन ठेव.

■

## ७३. माहीत नाही

पाहुण्यांनी छोट्या राजूची परीक्षा घेण्यासाठी त्याला विचारलं, ''बेरीज येते का तुला?''

''हो.''

''समज तुझ्याकडे चार संत्री आहेत, मी तुला आणखी तीन संत्री दिली तर किती होतील?''

''नाही माहीत. आमच्या शाळेत फक्त आंब्यांचीच गणितं विचारतात.'' राजू म्हणाला.

■

## ७४. सल्ला

हातातील भरपूर सामान कसेबसे सांभाळीत वत्सलाबाई चढावर

बाबागाडी ढकलत होत्या. त्यांचे ते हाल पाहून वसंतरावांनी चढ संपेपर्यंत त्यांना हातभार लावला.

" घर आलंच माझं, तुम्ही चहा घेता ? " वत्सलाबाई म्हणाल्या.

" हो. आनंदानं..... " घामाघूम झालेले वसंतराव पटकन म्हणाले.

" नाही म्हटलं, चहा घेता म्हणून एवढ्याशा चढाला तुम्हाला धाप लागली. तुम्ही नेहमी दूध घेत जा. " वत्सलाबाई म्हणाल्या.

■

## ७५. दया

रमेशच्या डोक्याला आलेलं भलंमोठं टेंगूळ पाहून बाबांनी विचारलं, " काय झालं रे ? कुणी मारलं तुला ? "

" प्रमोदनं मारलं मला. "

" अस्सं ? चल त्याच्या वडिलांना सांगू. "

" पण त्याचे वडील नाहीत घरी. "

" कुठं गेलेत ? "

" प्रमोदला घेऊन इस्पितळात गेलेत ते. " रमेश घाईघाईने म्हणाला.

■

## ७६. शाबास !

बंडू बऱ्याच वेळेपासून आरशासमोर डोळे मिटून उभा होता. आईने ते पाहून विचारले, " बंड्या, डोळे मिटून आरशापुढे का उभा आहेस ? "

" मी झोपलो म्हणजे कसा दिसतोय ते पाहायचं मला. " डोळे न उघडता बंडू म्हणाला !

■

## ७७. जुळ्याचं दुखणं !

" डॉक्टर, " एक नेत्ररूग्ण आपल्या डोळ्यांच्या डॉक्टरला सांगत होता. " आज सकाळी मी आरशात पाहत होतो. त्या वेळी माझ्या असे लक्षात आले, की माझा एक डोळा दुसऱ्या डोळ्यापेक्षा वेगळा दिसतोय ! "

" खरोखरच, आश्चर्य ! " डॉक्टर महोदय म्हणाले, " कोणता ? "

■

## ७८. सूचनापालन

''अनूप, तू पहिल्यांदाच पूजेला बसतोस, पण घाबरू नकोस. मी सांगेन तसं फक्त कर म्हणजे झालं.'' भटजींनी सांगितलं.

''हं, आता पळीत पाणी घे.''

''हाताची बोटं जमिनीकडे कर.''

''आता पळीतलं पाणी त्या बोटांवरून खाली सोड.''

''नाकाला हात लाव.''

तत्काळ अनुपनं भटजींचं नाक चिमटीत धरलं.

■

## ७९. जालीम औषध

बंड्या एका दुकानात जाऊन दुकानदाराला म्हणाला, ''काका, काल मी आपल्या दुकानातून शाईचे डाग घालवणारं औषध नेलं होतं...''

''हो आणखी हवंय का बाळ?'' दुकानदाराने विचारले.

''नाही. त्या औषधाचे डाग घालवणारं दुसरं एखादं औषध हवंय मला.'' बंड्या म्हणाला.

■

## ८०. भले शाब्बास!

भोलूने शेजाऱ्यांच्या मधूशी मारामारी केली. त्याला अपशब्द वापरले. तेव्हा बाबा म्हणाले, ''तू माझं नाक कापलंस.''

थोड्या वेळानं भोलू डॉक्टरांना घेऊन आला!

■

## ८१. दर

खुर्चीवर बसत रामजींनी विचारलं, ''तुमच्या सलूनचे दर काय आहेत?''

''कटींगचे पंधरा अन् दाढीचे पाच रुपये.''

''मग असं करा, डोक्याची दाढी करा,'' रामजींनी सूचना केली.

■

## ८२. त्रास

बाबूरावांच्या मुलाने मनगटी घड्याळ गिळले. त्यांनी डॉक्टरांची

भेट घेतली. सगळा किस्सा ऐकल्यावर डॉक्टर म्हणाले, ''त्याला यामुळे बराच त्रास होत असावा.''

''त्याला नव्हे मला त्रास होतोय,'' बाबूराव त्राग्यानं म्हणाले.

''तुम्हाला?''

''हो. जेव्हा घड्याळाला किल्ली द्यायचा विचार माझ्या मनात येतो तेव्हा हा कडकडून माझा चावा घेतो.'' बाबूराव म्हणाले.

■

## ८३. अजबच

शाळेतून परतलेला शंभू दप्तर आदळत आईला म्हणाला, ''मी नाही जाणार उद्यापास्नं शाळेत.''

''का रे, काय झालं?''

''कालच सर म्हणत होते की पाच अन् पाच दहा होतात आणि आज म्हणाले की आठ अन् दोन दहा होतात म्हणून.''

■

## ८४. जादू ई...

गृहशास्त्राची दररोज जोरदार प्रात्यक्षिके करणारी माधुरी एके दिवशी बाजारात जाऊन एका भाजीवाल्या बाईला म्हणाली, ''करपत नाही अशी एखादी भाजी आहे का हो तुमच्याकडं?''

■

## ८५. नकोच

डॉक्टर शहाण्यांना आपल्या बालरूग्णांची परीक्षा घ्यायचा छंद होता. एकदा आईबरोबर आलेल्या गोटूच्या नाकावर बोट ठेवत त्यांनी मुद्दामच विचारले, ''तर हा आहे तुझा कान?''

त्यांच्याकडे चमत्कारिक नजरेनं पाहत गोटू आईच्या कानात पुटपुटला, ''आई, आपण एखाद्या चांगल्या डॉक्टरकडे जाऊ.''

■

## ८६. जंगलाचा राजा

जंगलातील प्राणी आपल्याला वचकून असतात, हे पाहून एका सिंहाला भयंकर गर्व चढला. एके दिवशी आपल्या गुहेतून तो मोठ्या

गुर्मीत बाहेर पडला. समोरूनच एक अस्वल जात होतं. त्याला थांबवून सिंहाने त्याला दरडावून विचारलं, ''काय रे झिपऱ्या, या जंगलाचा राजा कोण?''

''आपणच महाराज.'' अस्वल म्हणाले अन् तिथून धूम पळाले.

मोठ्या खुशीत सिंहाची स्वारी पुढे निघाली. वाटेत भेटलेल्या हरणाला पाहून सिंहानं डरकाळी फोडली अन् त्याला विचारलं, ''खरं सांग, या जंगलाचा राजा कोण?''

''आपणच आहात महाराज. दुसरं कोण असणार?'' भेदरलेलं हरीण म्हणालं

सिंह पुढे निघाला. काही वेळानं त्याला डुलत डुलत येणारा एक हत्ती दिसला. सिंह त्याच्यापुढे जाऊन उभा राहिला अन् त्याकडे रोखून पाहत त्यानं विचारलं, ''ए जाडोबा, या जंगलाचा राजा कोण?''

हत्तीने क्षणभर किलकिल्या नजरेनं सिंहाकडे पाहिलं अन् पुढच्याच क्षणी त्याला आपल्या सोंडेत गच्च आवळून गरगर फिरवून दूर भिरकावून दिलं.

सिंह कसाबसा उठला आणि लंगडत लंगडत हत्तीपुढे येऊन म्हणाला, ''एवढं रागवायला काय झालं रे? एखाद्या प्रश्नाचं उत्तर तुला माहीत नसेल पण त्यासाठी एवढं रागवायला हवंस?''



## ८७. शेरास सव्वाशेर!

रात्रीच्या गडद अंधारात जहाजाच्या कप्तानाला जहाज वेगानं जात आहे त्या दिशेने समोर सरळ रेषेत उजेड दिसू लागला. काही क्षणांत तसेच पुढे गेल्यास जहाज त्यावर आदळण्याची शक्यता दिसू लागली. तसे जहाजाच्या कप्तानाने उजेडाच्या दिशेने इशारा दिला, 'तुमची दिशा १० डिग्री पूर्वेकडे वळवा.'

आता उजेडाच्या दिशेने कप्तानाला इशारा मिळाला, 'तुमचे जहाज १० डिग्री पश्चिमेकडे वळवा.'

क्रोधित झालेल्या कप्तानाने परत इशारा दिला, 'मी नावीक दलाचा कप्तान आहे. तुम्ही तुमची दिशा बदला असा मी हुकूम देतो.'

'मी दुय्यम दर्जाचा समुद्रखलाशी आहे; सर, आपणच आपल्या जहाजाचा मार्ग बदलेला बरा!'

जहाजाच्या कप्तानाचा संताप अनावर झाला. 'ही युद्धनौका आहे. मार्ग बदलण्याची मला सवय नाही.'

इतक्यात उजेडाच्या दिशेनं निर्वाणीचा इशारा त्याला मिळाला. 'मी दीपस्तंभ, तुम्हाला सुरक्षित मार्ग दाखवणारा!'

■

## ८८. शॉर्टफॉर्म

''अरे, आजकाल मी पाहतोय, तुम्ही सगळेजण एकमेकांना तुमच्या सगळ्यांच्या इंग्रजी आद्याक्षरांनीच हाक मारता. पण त्या अरुणलाच फक्त नावानं हाक मारता हे कसं काय?''

''सर, त्याचे पूर्ण नाव अरुण शांताराम सुळे आहे!''

■

## ८९. हेल्प

श्यामरावांनी टेलिफोन घेतला. बऱ्याच मित्रांना त्यांनी फोन केला. काही वेळाने कसलातरी विचार करून त्यांनी टेलिफोन खात्याला फोन लावला.

''हॅलोऽऽ'' पलीकडून आवाज आला.

''हॅलो, कोण? टेलिफोन विभाग?''

''हो.''

''माझ्या घरी आजच फोन बसवला आहे. जरा आमच्यासाठी थोडीशी तसदी घ्याल का?''

''जरूर. बोला.''

''आमच्या फोनची वायर जरा मोठी झालीय. त्यात पाय अडकून मुलं पडतील, अशी सारखी भीती वाटतेय. तुम्ही तिकडून थोडी खेचून घेता का? प्लीज.'' श्यामराव म्हणाले!

■

## ९०. सत्यवचनी

भुजंगरावांच्या बंगल्यासमोर उभ्या असलेल्या एका माणसाने भुजंगरावांना बंगल्याबाहेर पडताना पाहिले. जवळच खेळत असलेल्या एका लहान मुलाला त्याने विचारले, ''बाळ, हे सद्गृस्थ कोण आहेत?''

''ते सद्गृहस्थ! ते तर माझे बाबा आहेत,'' मुलाने सांगितले.

■

## ९१. तो कोण?

विमानतळ कार्य-प्रणालीच्या संदर्भात विस्तृत माहिती देऊन झाल्यावर प्रशिक्षकाने प्रश्न विचारले. विद्यार्थ्यांनी उत्तरे दिली.

दादूला प्रशिक्षकाने विचारले, ''वैमानिकाला विमान अमुक-तमुक दिशेला नेण्यासाठी सूचना देणाऱ्याला काय म्हणतात?''

''हवाई चाचा,'' दादू उत्स्फूर्तपणे म्हणाला!

■

## ९२. कोलंबस आला म्हणजे शोधेल

''हॅलो बॉईज- काय चाललंय?'' बन्याकाका.

''आम्ही देश-देश खेळतोय-'' प्रकाश.

''मग तो पिंटू पलंगाखाली काय करतोय?''

''तो म्हणजे अमेरिका; अजून शोध लागला नाही.''

■

## ९३. हॅपी

बेकरीतल्या खाद्यपदार्थांकडे आशाळभूतपणे पाहत उभ्या असलेल्या भिकाऱ्याला बेकरीवाल्यानं विचारलं, ''काय पाहिजे रे तुला?''

''कृपा करून मला या केकचा तुकडा द्याल का?''

''डबलरोटी नाही चालणार का?''

''चालेल पण आज माझा बर्थडे आहे साहेब.'' भिकारी म्हणाला.

■

## ९४. अपघात

''बंड्या, तुझ्या कपाळावर टेंगूळ कसं आलं? पुन्हा मारामारी केलीस की काय?''

''नाही आई.''

''खरं बोलतोयस तू?''

''हो ग. हे टेंगूळ तर अपघातामुळं आलंय्.''

''अपघात?''

''अगं, मी गंप्याच्या छाताडावर बसलो होतो पण त्याचे हात दाबून धरता आले नाहीत मला.''

■

## ९५. आज्ञाधारक

एका खेड्यातल्या लोहारानं आपल्या नव्या शिष्याला समजावलं, ''हे बघ, हा तापलेला लोखंडाचा तुकडा आहे, हा घण. मी डोकं हलवलं की ताकदीनं हा घण मारायचा, समजलं ना?''

आज्ञाधारक शिष्यानं सगळं लक्षपूर्वक ऐकून घेतलं आणि लोहारानं आपलं डोकं हलवल्याबरोबर घण वेगाने त्याच्या टाळक्यात हाणला.

हाच शिष्य आता त्या खेड्याचा नवा लोहार आहे.

■

## ९६. अग अग म्हशी...

गवळ्याकडून चांगलं दूध मिळत नाही, अशी तक्रार करणाऱ्या संपतरावांना एका मित्राने म्हैस विकत घेण्याचा सल्ला दिला. म्हैस विकत घेण्यापूर्वी त्यांनी या संदर्भातील बरीचशी माहिती गोळा केली. एका शुभमुहूर्तावर ते म्हैस खरेदीसाठी निघाले.

बऱ्याच म्हशी पाहून झाल्यावर त्यांना एक म्हैस पसंत पडली. लगेच त्यांनी वकिलाच्या थाटात प्रश्न विचारायला सुरुवात केली. बराच वेळ हा प्रकार चालला. म्हशीचा मालक पार कंटाळून गेला तेव्हा संपतरावांनी अखेरचा प्रश्न केला, ''मग तुमची म्हैस दूध देते म्हणायचं?''

''नाही साहेब. स्वत: होऊन देत नाही. धार काढावी लागते.'' कंटाळलेला मालक म्हणाला.

■

## ९७. पायलीचे पन्नास

अभिजीत आपल्या बऱ्याच दिवसांनी भेटलेल्या मित्रमंडळींना मोठ्या रुबाबात त्याला मिळालेल्या बढतीचे वर्णन तिखटमीठ लावून सांगत होता. आज तो कंपनीत उपाध्यक्षाच्या पदावर पोहोचला होता. मित्रमंडळींनी त्याची फिरकी घेतली. ''उपाध्यक्षांची पदे डझनांनी असतात बरं! आपल्या शहरातील सुपरमार्केटचंच पाहाना! तिथं केवळ किराणा मालाच्या पिशव्यांची देखरेख करणारा अशा पदावर आहे.''

रागावलेला अभिजीत म्हणाला, ''आताच मी तेथे फोन करून तुमचे म्हणणे कसे खोटे आहे ते सप्रमाण सिद्ध करून दाखवतो.''

त्याने सुपरमार्केटमध्ये फोन लावला आणि पिशव्यांचा विभाग असलेल्या

उपाध्यक्षांना तो जोडून देण्याची विनंती केली.

तशी त्याला पलीकडून मृदू भाषेत विचारणा झाली, "पेपर की प्लॅस्टिक?"

■

## ९८. बदल

खूप वर्षांनी दोन मित्र भेटले आणि जुन्या आठवणींत रंगून गेले.

पहिला: मी काय बावळट होतो नाही शाळेत असताना? काही बोलताच यायचं नाही मला कोणाशी नीट आणि आता जगभर व्याख्यानं देत फिरतो.

दुसरा: अरे वा!

पहिला: आणि मी किती लठ्ठही होतो तेव्हा. पण आता बघ, छान ठेवलीय की नाही तब्येत? अरे, मी रोज व्यायाम करतोय गेली कित्येक वर्षे!

दुसरा: अरे वा!

पहिला: अरे, पण तू काहीच सांगत नाहीयेस तुझ्याबद्दल! तुझ्यात काय काय बदल झालेत रे?

दुसरा: अरे, तुला आठवतं का की कोणी बडबड करायला लागलं, की मी काय संतापायचो? आता काही नाही, नुसतं 'अरे वा!' एवढंच म्हणतो!

■

## ९९. गरज नाही

डॉक्टर शहाणे मानसोपचारतज्ज्ञ होते. एका मेजवानीत त्यांच्याशी ओळख झाल्यावर संपतरावांनी त्यांना उत्सुकतेने विचारले, "एखादा माणूस मंदबुद्धीचा आहे, हे तुम्ही कसं ओळखता?"

"आम्ही काही प्रश्न विचारतो."

"मी नाही समजलो."

"उदाहरणादाखल मी प्रश्न विचारतो तुम्हाला."

"हो, हो, विचारा." संपतराव उत्साहाने म्हणाले.

"एका सेनापतीने तीन लढाया केल्या. १७६५ साली एक, १७८० साली दुसरी आणि १७९१ साली तिसरी. यांपैकी एका लढाईत त्याला

मृत्यू आला. तर कोणत्या लढाईत त्याला मरण आलं सांगा पाहू?''

''अं... अवघड आहे बुवा. तुम्ही दुसरा प्रश्न विचारा.''

''त्याची गरज नाही.''

■

## १००. तरीच

नदीत एक माणूस बुडत होता. काठावरच्या एका माणसानं लगेच धाडकन् नदीत उडी घेतली अन् आपला जीव धोक्यात घालून त्या बुडणाऱ्याला वाचवलं. किनाऱ्यावर जमलेल्या गर्दीनं वाचवणाऱ्याचं कौतुक केलं.

एकजण म्हणाला, ''फार मोठी जोखीम पत्करली तुम्ही.''

''तसं करणं भागच होतं मला.''

''म्हणजे?''

''हा बुडणारा माझे हजार रुपये देणं लागतो,'' वाचवणारा अनवधानाने बोलून गेला.

■

## १०१. बक्षीस

काशीनाथ: मी पाच किलो बर्फी खाऊन दाखवली, तर मला काय देशील?

सोमनाथ: दवाखान्यात जायचं भाडं.

■

## १०२. हुशार

शशांक आपल्या कुत्र्याबद्दल अभिमानाने बोलत होता, ''अरे, असला हुशार कुत्रा शोधून देखील सापडणार नाही. फारच हुशार आहे आमचा जंबो!''

''असं?''

''म्हणजे? काय करतो तो?''

''ओळख पाहू?''

''भुंकून-भुंकून गोंधळ घालत असेल.''

''हॅं! फारच हुशार आहे तो. असा कुणी अनोळखी माणूस

दिसला की तो हळूच सरपटत आत येतो आणि शेपूट खाली घालून पलंगाखाली जाऊन बसतो.''

■

### १०३. उंच उडी

शिक्षकांनी वर्गात प्रश्न विचारला, ''कांगारू किती उंच उडी मारू शकतो?''

''कुतुबमिनारएवढी.'' दादू पटकन म्हणाला.

''त्याचं उत्तर बरोबर आहे का?'' शिक्षकांनी बंडूला विचारले.

''म... माहीत नाही सर... मी कुतुबमिनारला कधी उडी मारताना पाहिलं नाही.'' बंडू म्हणाला.

■

### १०४. कुठे?

छोट्या जॉर्जवर सुसंस्कार करण्यासाठी त्याच्या पित्याने त्याला उपदेश केला. सगळं सांगून झाल्यावर जॉर्जनं त्यांना प्रश्न केला, ''डॅडी, मिशनरी मृत्यूनंतर स्वर्गात जातो ना?''

''अर्थातच.''

''अन् नरभक्षक?''

''नरकात जातो.''

''मिशनरी जर मृत्यूनंतर स्वर्गात जात असेल आणि नरभक्षक नरकात जात असेल तर, मिशनऱ्याला पोटात रिचवलेला नरभक्षक कुठे जाईल?''

■

### १०५. थुंकून टाक!

''$H_2SO_4$ म्हणजे काय?''

''सर अगदी जिभेवर आहे, पण...!

''अरे, लगेच थुंकून टाक ते. नाहीतर त्रास होईल!''

■

### १०६. सोपं आहे ते!

मित्रांबरोबर मोहन एका हॉटेलात शिरला. गेल्या-गेल्या त्यानं सर्वांसाठी डोसा मागवला. त्यांचं खाणं सुरू झालं. खाता-खाता मध्येच थांबून

त्यानं वेटरला बोलावून विचारलं, ''नवा कुक ठेवला की काय?''

''होय साहेब. पण तुम्हाला कसं कळलं?'' वेटरनं उत्सुकतेनं विचारलं.

''डोशात काळा केस दिसतोय. पूर्वी डोशात कधी-कधी पांढरा केस दिसायचा,'' मोहन उत्तरला.

■

## १०७. लवकर या!

संपतराव आपल्या नव्या नोकराला समजावत होते, ''हे बघ, जेव्हा माझ्याबरोबर बरेच लोक बोलत असतील तेव्हा चहा घेऊन बाहेर येत जाऊ नकोस. चहा मधल्या खोलीत ठेवून मला सांगायचं, 'साहेब, तुमचा फोन आलाय.''

नोकराने आज्ञाधारकपणे मान डोलावली.

एके दिवशी संपतराव चर्चा करत बसले होते. तेवढ्यात नोकर तेथे येऊन म्हणाला, ''साहेब, तुमचा फोन आलाय.''

''आलोच,'' असं म्हणून ते पुन्हा बोलत बसले. थोड्या वेळाने नोकर पुन्हा येऊन म्हणाला, ''साहेब, लवकर चला. तुमचा फोन गार होतोय.''

■

## १०८. बरं झालं!

विद्यार्थी-संसदेच्या निवडणुकीतील पडेल उमेदवार भोलाराम मित्रांशी बोलताना म्हणाला, ''बरं झालं मी निवडणुकीत पडलो ते.''

''का रे?''

''अरे, मी कुणाला कोणती आश्वासनं देऊन बसलो होतो, त्यातलं काहीसुद्धा लक्षात राहिलं नाही माझ्या.'' भोलाराम म्हणाला.

■

## १०९. अ-ज्ञान

''ममी, आमच्या मॅडमना कुत्रा कसा असतो तेच माहीत नाही मुळी.'' चिंटू म्हणाला.

''ऑ? कशावरून म्हणतोस तू हे?'' ममीनं आश्चर्यानं विचारलं.

''अगं, आज मी कुत्र्याचं चित्र काढून त्यांना दाखवलं तर

त्यांनी 'हे काय आहे?' म्हणून विचारलं मला.'' चिंटू सहजपणे म्हणाला.

■

### ११०. प्राणी

राम: काल मी प्राणीसंग्रहालय पाहायला गेलो होतो.
श्याम: अरे! मीसुद्धा काल तिथंच होतो.
राम: असं? कोणत्या पिंजऱ्यात होतास तू?

■

### १११. सध्या नकोच

नेहमी कसले-न्-कसले उपद्व्याप करणाऱ्या बंडूला एके दिवशी आईने बाबांबरोबर ऑफिसात पाठवले. बंडूला तयार करताना आईने त्याला बऱ्याचशा सूचनाही दिल्या. ऑफिसमध्ये पोहाचल्यावर काही काळ बंडू अगदी गप्प बसून होता. पण लवकरच त्याने गडबड करायला सुरुवात केली. बाबांनी त्याला खूप खूप समजावून पाहिले पण काही उपयोग झाला नाही. शेवटी सहनशक्तीचा अंत झाल्यावर त्यांनी घरी फोन केला, ''हॅलोऽऽ मी बोलतोय. इथं येऊन बंड्याला बराच वेळ झाला. आता त्याला घरी पाठवावं म्हणतो. कधी पाठवू?''

''तो अठरा वर्षांचा झाल्यावर.'' पलीकडून आवाज आला.

■

### ११२. हे नाही तर ते....

रामपूरजवळून जाणाऱ्या राजरस्त्यावरून वाहने मोठ्या वेगाने जायची. नगरपालिकेच्या सदस्यांनी यावर विचारविनिमय केला अन् एक फलक लावला. मजकूर होता- 'वाहने सावकाश चालवा अन् आमचा गाव पाहा.'

हा फलक लावूनही फारसा उपयोग झाला नाही, तेव्हा या मजकुरात वाढ करण्यात आली. ती अशी- 'वाहने भरधाव चालवा अन् आमचा तुरुंग पाहा.'

■

### ११३. माहिती

इकडे तिकडे भटकणाऱ्या एका गाईला पांजरपोळाच्या कर्मचाऱ्याने

पकडले. तिच्यासोबत वासरूही होतं. या गाय अन् वासराच्या मालकाचा शोध घ्यायचा त्याने प्रयत्न केला पण कुणीच पुढं आलं नाही. शेवटी कंटाळून तो मोठ्यानं ओरडला, ''ही गाय अन् वासरू कुणाचं हाय ?''

''गाय तर माहीत नाही पण वासरू कुणाचं आहे हे मात्र मी सांगू शकेन.'' गोपाळ म्हणाला.

''कुणाचं वासरू हाय ?''

''गाईचं.'' गोपाळ सहजपणे म्हणाला.

■

### ११४. काय ?

सारखे प्रश्न विचारून भंडावून सोडणाऱ्या सचिनला त्याचे बाबा म्हणाले, ''बाळ, किती प्रश्न विचारतोस ? मी तुझ्या वयाचा असताना इतके प्रश्न माझ्या वडिलांना विचारले असते तर काय झालं असतं माहीत आहे ?''

''कदाचित तुम्ही माझ्या काही प्रश्नांची उत्तरे नक्कीच देऊ शकला असता.'' सचिन म्हणाला.

■

### ११५. काय करणार ?

'माझा कुत्रा' या विषयावरचा महेश्वरचा निबंध वाचून शिक्षक म्हणाले, ''अरे, हा निबंध तर तंतोतंत तुझ्या भावाने लिहिलेल्या निबंधासारखा आहे.'

''आमच्याकडे एकच कुत्रा आहे सर... त्यामुळं त्यावरच निबंध लिहावा लागला आम्हाला.'' महेश्वर म्हणाला.

■

### ११६. त्यांना सांग !

महेशनं आईला विचारलं, ''आपल्यापेक्षा छोट्यांना मारणं योग्य आहे का ग ?''

''मुळीच नाही बाळ.''

''मग तसं आमच्या बाईंना सांग बरं. त्यांना ते माहीत नसावं,'' महेश म्हणाला.

■

## ११७. काळजी

"अरे, तुझे केस तर गळायला लागलेत. टक्कलच पडलंय तुला. कशामुळं झालंय हे?"

"काळजीमुळे?"

"कसली काळजी?"

"केस गळण्याची."

■

## ११८. अनुभवसिद्ध

"ते घर? घर आहे का ते? शुद्ध गोठा आहे गोठा!" संपतराव आपल्या ऑफिसात नव्याने आलेल्या मित्राला सांगत होते, "ते घर तू भाड्यानं घेऊ नयेस असं मला प्रामाणिकपणे वाटतं बघ. अरे, तिथं फक्त जनावरंच राहू शकतात."

"पण तुला कसं ठाऊक आहे हे?" मित्राने विचारले.

"अरे, तब्बल दहा वर्षे काढलीत मी तिथं!" संपतरावांनी खुलासा केला.

■

## ११९. धोका(च)

भला मोठा ट्रान्सफॉर्मर लावलेल्या विजेच्या खांबावर विद्युत मंडळाने लावलेला एक फलक...

'धोका! या खांबाला स्पर्श करू नका. स्पर्श करणारा जिवंत राहणे केवळ अशक्य आहे. यावरही जे स्पर्श करतील त्यांच्यावर कायदेशीर इलाज केला जाईल.'

■

## १२०. वृत्तांत

रेल्वेमार्गाची निगराणी करणाऱ्या एका कर्मचाऱ्याला आपला वृत्तांत अत्यंत तपशीलवार लिहिण्याची खोड होती. एकदा त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याने त्याला लिहिले, 'वृत्तांत मोजक्या शब्दांत लिहावा.'

या सूचनेनंतर त्याच्याकडून आलेला वृत्तांत असा- 'जेथे रूळ होते तेथे आज नदी आहे.'

■

### १२१. कमालच

एका कार्यालयाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी उमेदवार तरुणीला विचारले, "तुम्हांला लघुलिपी येते?"

"हो येते, पण ते लिहायला थोडासा जास्त वेळ लागतो मला," ती उत्तरली.

■

### १२२. समजलं?

महिला मंडळाच्या एका कार्यक्रमात प्रख्यात कसरतपटू करंजकर बोलत होते 'आरोग्य आणि अन्न' या विषयावर त्यांचे व्याख्यान सुरू होते. अति खाण्यामुळे होणाऱ्या दुष्परिणामावर बोलून झाल्यावर शेवटी ते म्हणाले, "खरं म्हणजे तुम्ही जेवढं जेवता त्याचा केवळ एक तृतीयांश भागच तुम्हाला जिवंत ठेवण्यासाठी पुरेसा आहे."

"मग बाकीच्या दोन तृतीयांश भागाचं होतं तरी काय?" एका महिलेने उत्सुकतेने विचारले.

"त्यावर डॉक्टर जगतात!" करंजकरांनी त्यांचे शंकासमाधान केले.

■

### १२३. मदत

डॉक्टर शहाण्यांच्या एका मित्राने त्यांच्याकडे दोनशे रुपये उसने मागितले, तेव्हा ते दिलगिरीच्या स्वरात म्हणाले, "माफ कर मित्रा, मी तुला दोनशे रुपये उसने देऊ शकत नाही. पण एवढ्या रुपयांच्या किमतीची सेवा मात्र करू शकेन."

"कोणती?"

"मी तुझे टॉन्सिल्स् मोफत काढून देईन." डॉक्टर शहाणे म्हणाले.

■

### १२४. आता बोला

दिवाळीच्या सुटीत सारे कुलकर्णी कुटुंब दक्षिण भारताच्या सहलीला निघाले. निघण्याच्या तीन महिने आधीपासूनच जय्यत तयारी चालली होती. अनंतराव कुलकर्ण्यांनी तमिळ भाषा शिकण्याचा उपक्रम हाती

घेतला होता.

चेन्नईला एका टॅक्सीत बसल्यावर ड्रायव्हरशी सुसंवाद साधण्याचा त्यांनी प्रयत्न केला, तेव्हा ड्रायव्हरने आपण मुके अन् बहिरे असल्याचे त्यांना सांगितले!

चेन्नईला प्रेक्षणीय स्थळांना भेट देण्यासाठी 'सोबत एक गाईड हवा' अशी मागणी त्यांनी हॉटेलवाल्यांना केली. त्यांना एक गाईड मिळवून देण्यात आला.

अनंतरावांनी त्याला तमिळ भाषेतून बऱ्याच सूचना दिल्या अन् शेवटी विचारले, "किती पैसे घेणार तुम्ही?"

"तसं तर मी दोनशे रुपये घेत असतो. पण जर दिवसभर तुम्ही माझ्याशी तमिळमधून बोलणार असाल तर मग पाचशे रुपये घेईन," गाईड म्हणाला!

■

## १२५. *विजयी!*

टिंगू: आई! माझा धावण्याच्या शर्यतीत दुसरा नंबर आला.

आई: शाब्बास बेटा! शर्यतीत किती मुलांनी भाग घेतला होता?

टिंगू: दोन मुलांनी!

■

## १२६. *कमाई*

आपल्या प्रामाणिकपणाबद्दल विख्यात असलेल्या प्रा. जनमेजय यांनी आपले आत्मचरित्र लिहून काढले. ते प्रकाशितही झाले. त्या संदर्भात बोलताना एकदा त्यांच्या एका मित्राने विचारले, "आपलं आत्मचरित्र लिहून तू काय मिळवलंस?"

"दोन हजार शत्रू!" प्राध्यापक महोदय शांतपणे म्हणाले.

■

## १२७. *दिलासा*

बंकूच्या शाळेत निवडणुकीची धामधूम सुरू होती. निवडणुकीच्या आदल्या दिवशी बाबांनी त्याला विचारले, "तुझ्या वर्गातून वर्गप्रतिनिधी म्हणून किती उमेदवार निवडणुकीला उभे राहिले आहेत?"

" फक्त दोनच."

" त्यांच्याबद्दल काय मत आहे तुझं ? "

" देवाच्या दयेने त्यांच्यापैकी फक्त एकच निवडून येणार आहे. हीच गोष्ट मोठी दिलासा देणारी वाटते मला!" बंकूनं आपलं मत सांगितलं.

■

## १२८. प्रचिती

खाता-खाता दादूला पाहून मनोहरनं खात असलेली वस्तू पटकन् लपवली. पण ते दादूच्या नजरेतनं सुटलं नाही. त्यानं विचारलं, " काय खातोयस् रे ? "

" बुद्धिमान करणारे औषध आहे हे." मनोहर गंभीरपणे म्हणाला.

" असं ? मग मलाही दे ना थोडंस." दादूनं विनवलं.

" फुकटात मिळायचं नाही. पाच रुपये किंमत आहे त्याची."

दादूनं पटकन् पाच रुपये काढले अन् मनोहरच्या हातावर ठेवले. मनोहर त्याला ती वस्तू देत म्हणाला, " डोळे मिटून पटकन् खाऊन टाक हं."

दादूनं त्याच्या सूचनेचं तंतोतंत पालन केलं पण वस्तू तोंडात पडताच तो डोळे उघडून जोरानं म्हणाला, " अरे, हा तर गूळ आहे नुस्ता."

" बघ बरे बुद्धिमान झालास की नाही तू ? " मनोहर म्हणाला.

■

## १२९. पत्र

वेड्यांच्या इस्पितळात पाहणी करत असताना राजाभाऊंना एक वेडा काहीतरी लिहीत असल्याचे दिसले. जवळ जाऊन त्यांनी उत्सुकतेने त्याला विचारले, " काय लिहितो आहेस तू ? "

" पत्र."

" कुणाला ? "

" मलाच. आणखी कुणाला ? "

" काय लिहिलंय यात ? "

" काय माहीत ? अजून हे पत्र मला मिळालेलं नाही." राजाभाऊंकडे अजब दृष्टीने पाहत तो म्हणाला!

■

### १३०. जय रंगरूट

लष्करी सत्ता असलेल्या राष्ट्रातील एक तरुण आपल्या मित्राला सांगत होता, ''मी तीन कारणांसाठी लष्करात भरती झालो. पहिले कारण म्हणजे मला माझ्या देशाची सेवा करावयाची होती. दुसरं कारण मला माझी तब्येत चांगली करावयाची होती आणि तिसरं कारण म्हणजे सरकारचे लोक आले आणि त्यांनी मला सक्तीने भरती करण्यासाठी पकडून नेले.''

■

### १३१. कारण

''या बसमध्ये प्रथमोपचार पेटी का ठेवलेली नाही?'' रामभाऊंनी राज्य परिवहन मंडळातील एका अधिकाऱ्याला प्रश्न केला.

''आमच्या येथे किरकोळ अपघात कधीच होत नाहीत,'' अधिकाऱ्यानं कारण दिलं!

■

### १३२. अवघड

चिंतातूर मुद्रेत उभ्या असलेल्या पंकजला रस्त्यानं जाणाऱ्या एका सद्‌गृहस्थाने विचारले, ''काय झालं बाळ, असा का उभा आहेस?''

''अंकल, हे फाटक लावायचं आहे अन्...''

''हात्तीच्या एवढंच ना. मी लावून देतो. त्यात काय अवघड?'' फाटक सहजपणे लावत ते म्हणाले.

''अवघड नाही. पण या फाटकाचा रंग ओला आहे.'' पंकज म्हणाला.

■

### १३३. क्या समझे?

एका कवीने एका प्रख्यात मासिकासाठी आपली कविता पाठवली. सोबत पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं होतं-

'माझी कविता तुमच्या मासिकातून प्रसिद्ध व्हावी, अशी माझी इच्छा आहे. मी तुमचा एक जुना वर्गणीदार आहे हे कृपया ध्यानात घ्यावे.'

संपादकानं उत्तर दिलं, 'ते ठीक आहे. परंतु आमचे इतर जे

तुमच्यापेक्षाही जुने वर्गणीदार आहेत, त्यांचा आधी विचार करणे आम्हाला भाग आहे.'

■

### १३४. मूर्ख कुठला!

हळूहळू वेग कमी होत होत शेवटी गाडी थांबली. आपल्याच विचारांत मग्न असलेल्या अजबसिंगांची तंद्री भंग पावली. त्यांनी विचारलं, "ड्रायव्हर, गाडी का थांबवली?"

"साहेब, पेट्रोल संपलंय," ड्रायव्हर म्हणाला.

"मग पटकन् गाडी पेट्रोलपंपाकडे ने, नुसता बसून काय राहिलास?" अजबसिंग रागावून म्हणाले.

■

### १३५. घरीसुद्धा तेच?

केशवरावांना कार्यालयात पोहोचायला बराच उशीर झाला. साहेबांनी त्यांची कानउघडणी करून विचारलं, "इतका उशीर कशामुळे झाला?"

"झोपेतून उठायला उशीर झाला सर."

"म्हणजे! घरीसुद्धा तुम्ही झोपाच काढता वाटतं?" साहेबांनी आश्चर्य व्यक्त केलं.

■

### १३६. कमालच आहे!

सजीवांना जगण्यासाठी प्राणवायू कसा आवश्यक आहे, हे सांगून शिक्षक म्हणाले, "ऑक्सिजन उर्फ प्राणवायूचा शोध प्रिस्टले नावाच्या शास्त्रज्ञाने लावला."

"मग त्यापूर्वी लोक जिवंत राहायचे कसे?" बंड्याने आश्चर्याने विचारले.

■

### १३७. हनुमान लीला

माधोपूरच्या तुरुंगाधिकाऱ्याने एक अभिनव प्रयोग केला. तुरुंगात रामलीला आयोजित केली. कैद्यांनी त्यात उत्साहाने भाग घेतला. वर्तमानपत्रांनी

या उपक्रमाची खूप प्रशंसा केली. दुसऱ्याच दिवशी वरिष्ठांनी तुरुंगाला भेट दिली. तुरुंगाधिकाऱ्याची त्यांनी मुक्त कंठाने प्रशंसा केली. पण तुरुंगाधिकाऱ्याच्या चेहऱ्यावर आनंद काही दिसेना; उलट त्यांचा चेहरा भलताच चिंताक्रांत दिसू लागला. तेव्हा वरिष्ठांनी विचारले, ''काय हो, काय शंका आहे ?''

''सर... संजीवनी आणण्यासाठी काल गेलेला हनुमान अजून परतलेला नाही,'' तुरुंगाधिकारी म्हणाला.

■

## १३८. कशासाठी...

लंडनमध्ये 'सेंट मेरी' हायस्कूलच्या विद्यार्थ्यांना दर रविवारी चर्चमध्ये नियमितपणे जावं लागतं. तिथं त्यांना धर्मोपदेश करून त्यांच्यावर चांगले संस्कार करण्याचा प्रयत्न केला जातो. एके रविवारी फादर म्हणाले, ''आपल्याला सुखी व्हायचं असेल, तर नियमितपणे चर्चमध्ये जाऊन प्रार्थना केली पाहिजे. पण जगात अशी काही दुर्दैवी माणसं आहेत, की ज्यांना चर्चअभावी प्रार्थना करणं शक्य होत नाही. अफ्रिकेतील प्रदेशात तर दोनशे चौरस मैलांच्या परिसरात एकही चर्च नाही. तेव्हा तुम्ही देणग्या गोळा करण्याचं काम केलं पाहिजे. हा पैसा कशासाठी गोळा करायचा सांगा पाहू ?''

''आपल्याला त्या प्रदेशात जाता यावं म्हणून!'' सगळे एका स्वरात ओरडले!

■

## १३९. धैर्यधर

सर्कशीच्या मॅनेजरने नोकरी मागण्यासाठी आलेल्या युवकाला सांगितले, ''सर्कशीतलं काम एवढं सोपं नाही. सर्कशीत वाघाशी दोन हात करावे लागतील.... म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूशी दोन हात करावे लागतील. तुझी तयारी आहे काय ?''

''मृत्यूशी मी केव्हाही दोन हात करायला तयार आहे. पण...''

''पण काय ?''

''पण हा वाघ तर जिवंत आहे!'' युवक पुटपुटत म्हणाला.

■

### १४०. राजाच तो!

वाघ अंडी घालतो की पिलं देतो यावरून अंजू आणि मंजू यांच्यात वाद सुरू झाला. अंजूचं म्हणणं होतं की वाघ अंडी घालतो, अन् मंजूचं मत होतं की वाघ पिलं देतो. बराच वेळ वादावादी झाल्यावर दोघींनी रंजना मावशीला विचारायचं ठरवलं. मावशीकडे जाऊन त्यांनी विचारलं, ''मावशी, वाघ अंडी घालतो की पिलं देतो?''

मावशीनी क्षणभर विचार केला अन् म्हणाली, ''वाघ म्हणजे जंगलचा जणू राजाच! त्याला वाटेल तसं तो वागणार.... त्यामुळं मनात आलं की तो अंडी घालतो अन् मनात येईल तेव्हा पिलं देतो.''

■

### १४१. दार उघडा

ऑफिस सुटल्यावर काही काम करून चार पैसे जास्तीचे मिळवावेत या हेतूने संपतरावांनी विजेच्या उपकरणांच्या दुरुस्तीचे काम सुरू केले. हे काम ते आपल्या घरीच करायचे. दारावर त्यांनी एक पाटी लावली होती. मजकूर असा... 'येथे विजेच्या उपकरणांची दुरुस्ती केली जाते. संपर्क साधण्यासाठी बाजूचे घंटीचे बटण दाबा.''

त्या पाटीखाली एका मुलाने लिहिले, 'घंटा वाजली नाही, तर दार ठोठवा.'

■

### १४२. नवख्या

एकदा अंधाऱ्या गल्लीतून चाललेल्या भुंजगरावांना एका इसमाने हटकले, ''थांब, थांबतोस की नाही?''

भुजंगराव थांबले अन् त्यांनी संथपणे विचारले, ''काय आहे?''

''तुझ्याकडे असलेले सारे पैसे ताबडतोब माझ्या हवाली कर... नाहीतर...''

बलदंड भुजंगरावांनी त्या माणसाकडे रोखून पाहत विचारले, ''नाहीतर काय? काय करशील?''

''नाहीतर काय करायचं ते मलाही नेमकं माहीत नाही. ही माझी पहिलीच वेळ आहे!'' तो इसम म्हणाला.

■

### १४३. उठि...उठि....

कसल्याशा कारणामुळे अमोलने आईशी अबोला धरला होता. दोन दिवस लोटले. एके दिवशी गृहपाठ करण्यासाठी त्याला सकाळी लवकर उठायचे होते. खूप वेळ विचार करून त्याने एक युक्ती शोधून काढली. त्याने आईच्या नावाने एक चिठ्ठी लिहिली. त्यात सकाळी पाच वाजता उठविणे, असे लिहिले व आईला सहजच मिळेल अशा ठिकाणी चिठ्ठी ठेवून तो झोपला.

सकाळी अमोलला जाग आली तेव्हा सात वाजले होते. आईने उठवले नाही म्हणून रागवलेल्या अमोलने आईला बोलण्यासाठी तोंड उघडले. तोच त्याची नजर उशीजवळ पडलेल्या चिठ्ठीकडे गेली. त्याने चिठ्ठी उघडून पाहिली. त्यावर आईने लिहिले होते, 'पाच वाजले, ऊठ!'

■

### १४४. अन्यायच

वर्गात दंगा करणाऱ्या दोन मुलांना देशपांडे सरांनी शाळा सुटल्यावर थांबवून घेतलं. दोघांना त्यांनी आपली आडनावे पाचशे वेळा लिहिण्याची शिक्षा फर्मावली. ती शिक्षा ऐकताच एकाने कुरकूर केली, "हा माझ्यावर अन्याय आहे सर."

"अन्याय? कसला अन्याय रे?" सर डाफरले.

"सर, याचं आडनाव 'पै' आहे अन् माझं 'इचलकरंजीकर!" त्याने आपली बाजू मांडली.

■

### १४५. म्हणूनच तर...

रामा गडी अजीजीनं म्हणत होता, "बाईसाहेब, मोजून मला ईस वर्सं झाली. कदीतरी म्या पगार वाढवून द्या असं म्हनलो का?"

"तसं म्हणाला नाहीस म्हणूनच तर आमच्याकडे टिकून राहू शकलास," बाईसाहेब उत्तरल्या.

■

### १४६. हवे तेवढे

एका आडवाटेवर एक कार बंद पडली. कारवाल्याने बाहेर येऊन

कुठे बिघाड झाला, याचा अंदाज घेतला. थोड्याच वेळात तेथून जाणाऱ्या एका माणसाला थांबवून त्याने विचारले, ''इथे मोटारीचे स्पेअर पार्टस् जवळपास कुठे मिळतील हो?''

मोटारवाल्याला आपादमस्तक न्याहाळीत तो म्हणाला, ''तुम्ही असं करा. असंच सरळ चालत त्या टेकडीपर्यंत जा. टेकडीच्या पलीकडे मोठी दरी आहे. तिथे हवे तेवढे स्पेअर पार्टस् मिळतील तुम्हाला.''

■

### १४७. भले

राजाराम आपल्या नोकरावर डाफरत होते, ''गाढवा, माझा रेनकोट घालण्याची तुझी हिंमतच कशी झाली?''

''तुमच्याच भल्यासाठी साहेब,'' नोकर म्हणाला.

''म्हणजे?''

''मी रेनकोट घातला नसता तर तुम्ही दिलेली पँट खराब झाली असती ना,'' नोकराने स्पष्टीकरण दिले.

■

### १४८. कृपाच

एका शोकसभेत बोलताना मंत्रीमहोदय म्हणाले, ''परमेश्वरी कृपेने मृत्यूसारखं दुःख जीवनात सर्वांत शेवटी भोगावं लागतं. जरा विचार करा, जर हे दुःख जीवनाच्या प्रारंभीच किंवा मध्यंतरी भोगावं लागलं असतं, तर ते किती कष्टदायक झालं असतं?''

■

### १४९. चमत्कार

डॉक्टर शहाणे आपल्या एका नव्या पेशंटला म्हणत होते, ''पाहिलात माझ्या औषधोपचाराचा चमत्कार! किती फ्रेश दिसताय तुम्ही. तुम्ही पन्नास वर्षांचे आहात असं कोण म्हणेल?''

''अहो डॉक्टर, पण माझं वय तर तीस वर्षं आहे.'' पेशंट म्हणाला.

■

### १५०. त्यावर अवलंबून आहे....

शिकवत असताना 'लोकभ्रम' असा शब्द आला. त्याचे स्पष्टीकरण देताना चव्हाण सरांनी वेगवेगळ्या समाजांत प्रचलित असलेल्या विविध शकुन-अपशकुनांची माहिती दिली.

माहिती देऊन झाल्यावर दादूने उत्सुकतेने विचारले, "काळं मांजर पाठोपाठ चालत आलं तर तो अपशकुन समजायचा का?"

"तुम्ही माणूस आहात की उंदीर यावर ते अवलंबून आहे," सर म्हणाले.



### १५१. दुसरं काय करणार?

आनंदराव फोनवर बोलत होते.... "डॉक्टरसाहेब, लवकर या तुम्ही. आमच्या चिरंजीवांनी चक्क पेन गिळून टाकलंय. तुम्ही ताबडतोब निघा."

"हो...हो... हा निघालोच. पण मी तेथे पोचेपर्यंत तुम्ही काय करणार?" डॉक्टरांनी विचारलं.

"मी तोपर्यंत पेन्सिलीनं लिहीन," आनंदराव निःश्वास टाकून म्हणाले.



